**युनिसेफ व ग्रामविकास विभाग यांच्या सहकार्याने कोल्हापूर जिल्ह्यातील कागल तालुक्यात Child and Gender Friendly Kagal योजना प्रायोगिक तत्वावर राबविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः व्हीपीएम-२०२०/प्र.क्र. २०५/पंरा-३**
सार्वजनिक बांधकाम भवन, मर्झबान पथ,
फोर्ट,मुंबई.४०० ००१
तारीख: ३० सप्टेंबर,२०२०

**प्रस्तावना :-**

सहस्त्रक विकास उद्दीष्टांनुसार (Millenium Development Goals) बालकांच्या व किशोरांच्या सुद्दढ आणि यशस्वी विकासासाठी तसेच त्यांच्या आरोग्य, शिक्षण, पोषण व विकास व संरक्षण यांसाठी, खात्री देण्यात आली आहे. त्यानुसार महाराष्ट्रात बालकांचे हक्क अबाधित राखण्यासाठी शासनाने बाल विकास धोरण निश्चित केले आहे. ग्रामीण भागातील महिला व बालकांच्या विकास व संरक्षणाच्या अनुषंगाने पोषक वातावरण तयार करणे, त्यांच्या प्रशासन सक्रीय सहभाग वाढविणे व त्याअनुषंगाने पंचायतराज संस्थांचे अभिन्न अंग असलेल्या ग्रामपंचायतींना क्षमता आधारित बांधणी करणे (Capacity Building) व त्यांना महिला व बालकांच्या विकास अनुकुल वातावरण निर्मिती करण्यास प्रोत्साहित व प्रशिक्षित करणे गरजेचे आहे. याच पार्श्वभूमीवर संयुक्त राष्ट्राच्या UNICEF या संघटनेने ग्रामविकास विभागाच्या सहकार्याने कोल्हापूर जिल्ह्यातील कागल तालुक्यात“ Child And Gender Friendly Kagal” ही योजना प्रायोगिक तत्वावर राबविण्याचा प्रस्ताव सादर केला आहे. सदर प्रस्ताव प्रायोगिक तत्वावर लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

युनिसेफ यांनी ग्रामविकास विभागाच्या सहकार्याने प्रायोगिक तत्वावर कोल्हापूर जिल्हयातील कागल तालुक्यात “बालक व लिंग अनुकुल कागल”पथदर्शी प्रकल्प प्रायोगिक तत्वावर राबविण्याचे प्रस्तावित केले आहे. याअंतर्गत ग्रामपंचायत हा घटक मानून तालुका स्तरावर नियोजन करण्याचे प्रस्तावित केले आहे.

२. युनिसेफ यांनी, बालक व लिंग अनुकुल कार्यक्रमाच्या अनुषंगाने ग्रामपंचायतींच्या प्रशासनात बाल विकास साठी सुयोग्य वातावरण तयार करण्याच्या अनुषंगाने उत्तरदायी ठरविणे, महिलांचा स्थानिक पातळीवरील निर्णय प्रक्रीयेत सक्रीय सहभाग वाढविणे इ.बाबत Child and Gender Friendly Kagal या नावाने, प्रस्ताव सादर केला आहे. सदर प्रस्तावाचा कृती कार्यक्रम पुढीलप्रमाणे आहेत-

१. कागल तालुक्यातील ८३ ग्रामपंचायतीं स्तरावर बालक व लिंग अनुकुलतेच्या अनुषंगाने नियोजन, निधीचे अर्थ संकल्पन व देखरेख करणे.
२. तालुक्यातील ग्रामपंचायतींमध्ये देखरेख प्रणाली अंमलबजावणी.
३. प्रशासनात महिला व बालकांचा सक्रीय सहभागाबाबत अंमलबजावणी.
४. प्रत्येक समुहांतर्गत महिलां करिता आर्थिकदृष्टया व्यवहार्य बाबींची अंमलबजावणी करणे.
५. बाल हक्क व लिंग अनुकुलता बाबत समाजात जागरूकता निर्माण करणे.
६. स्थानिक पातळीवर आरोग्य, पोषण, धान्यवितरण,आजिविका, सामाजिक सुरक्षा व तक्रारीचे निवारण याबाबींसंदर्भात आवश्यक सामाजिक सुरक्षा प्रदान करणे.

## ३. निधीची उपलब्धता-

युनिसेफ यांनी सदर कार्यक्रम दोन वर्ष कालावधीसाठी राबविण्याचे प्रस्तावित केले आहे. याकरिता रू.७०,०००/- (रू.सत्तर हजार मात्र) प्रति वर्ष प्रति ग्रामपंचयत खर्च अपेक्षित आहे. संपूर्ण कालावधीचा खर्च रू.१,२५,४२५,०००/-( रू. एक कोटी पंचवीस लाख पंचेचाळीस हजार ) इतका येणार आहे. यापैकी, रू.५५ लाख इतकी रक्कम युनिसेफ द्वारे उचलण्यातयेणार आहे. उर्वरित रू.७०.४५ लाखाची तरतूद विभागास करावी लागणार आहे.

| Total Fund Requirement : (For Two Years) Fund Requirement | Rs.१,२५,४५,०००/-Rs.७०,०००/- approximately per year for each GP |
|---|---|
| Total UNICEF Contribution<br>१. Programme Support ( Orientation and Demonstration of monitoring system and other activies)<br>२. Technical Support Cost<br>( २ Consultants for Programme Designing, Implementation, Coordination recruited at UNICEF level) | Rs.२५,००,०००/- (For Two years)<br><br>Rs.३०,००,०००/- ( For Two years) |
| Contribution from RD & PR/ Dist. Admin( Fund to be Mobilized) | Rs.७०,४५,०००/-( For Two years) |

शासन हिस्सा रू.७०.४५ लाख इतक्या निधीची तरतूद राज्य प्रकल्प संचालक, राज्य ग्रामीण विकास संस्था, यशदा पुणे यांच्या अधिनस्त असलेल्या ग्रामविकास विभागास पुरस्कार प्राप्त निधीतून भागविण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

सदर योजनेच्या तांत्रिक व इतर प्रशिक्षणाच्या बाबींसंदर्भात समन्वयन युनिसेफ इंडिया यांचे मार्फत करण्यात येईल.

सदर योजनेच्या यशस्वीपणे अंमलबजावणी करिता जिल्हा परिषद, कोल्हापूर व गटविकास अधिकारी,कागल यांनी युनिसेफ यांच्या सहकार्याने पुढील आवश्यक कार्यवाही करावी व योजनेच्या अनुषंगाने वेळोवेळी अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९३०१२२९५३९३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suhas B. Jadhwar

Digitally signed by Suhas B. Jadhwar
DN: cn=Suhas B. Jadhwar, o=Suhas B. Jadhwar, ou, email=suhas.jadhwar@nic.in, c=IN
Date: 2020.09.30 16:35:57 +05'30'

**( सु.बा.जाधवर )**
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन,मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई
३. मा.मंत्री ( ग्राम विकास ), यांचे खाजगी सचिव मंत्रालय,मुंबई
४. मा. राज्यमंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव मंत्रालय,मुंबई
५. सर्व मा.मंत्री व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
६. मा. विरोधी पक्षनेता महाराष्ट्र विधानसभा/विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
७. अध्यक्ष, विधानसभा/विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई
८. अपर मुख्य सचिव, ग्रामविकास विभाग यांचे स्वीय सहायक,
९. सर्व विभागीय आयुक्त.
१०. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद.
११. राज्यप्रकल्प संचालक, राज्यग्रामीण विकास संस्था, यशदा पुणे.
१२. अनुराधा नायर, सामाजिक धोरण विशेषज्ञ, युनिसेफ - महाराष्ट्र, अंधेरी,मुंबई.

निवडनस्ती (पंरा-३)